**पुणे तसेच पिंपरी-चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी बाराव्या तिमाही हप्त्याचा निधी वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीसीटी-०८१५/प्र.क्र.२७/भाग-३/पोल-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक: ५ डिसेंबर २०१८.

**वाचा :**

१) शासनाचे क्रमांक आयएसएस-१०१२/प्र.क्र.७१/विशा-४,दि.१७.९.२०१३ चे इरादा पत्र (Letter of Intent)
२) गृह विभाग,शासन निर्णय क्र. आयएसएस-१०१२/प्र.क्र.७१/विशा-४, दि.१४.१०.२०१३
३) महाराष्ट्र शासन आणि मे. अलाईड डिजिटल सर्व्हिसेस लि. यांचे दरम्यान दि.२८.१०.२०१३ रोजी झालेला करारनामा.
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७.४.२०१५
५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२.४.२०१८
६) गृह विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र. क्र. ६४/विशा -३(अ), दि.०४.०८.२०१७.
७) उपमहाव्यवस्थापक, मे.बीएसएनएल, पुणे यांचे दि.०६.११.२०१७ रोजीचे पत्र.
८) संचालक, अलाईड डिजिटल यांचे दि.२५.१०.२०१८ रोजीचे पत्र व देयक.
९) मे. प्राईसवॉटरहाऊस कूपर्स कंपनी यांचा दि.१६.११.२०१८ रोजीचा ई-मेल.
१०) पोलीस आयुक्त, पुणे यांचे दि.२२.११.२०१८ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :**

पोलीस आयुक्त, पुणे यांचे अधिनस्त पुणे व पिंपरी-चिंचवड शहरांमध्ये सीसीटीव्ही प्रकल्प राबविण्याबाबत मे.अलाईड डिजिटल सर्व्हिसेस लि. कंपनीला दि.१७.९.२०१३ रोजी इरादापत्र (Letter of Intent) देण्यात आले होते. संदर्भाधीन क्र. २ येथे नमुद गृह विभाग, शासन निर्णय दि.१४.१०.२०१३ अन्वये सदर प्रकल्पास व त्यासाठी येणाऱ्या संभाव्य रु. २२५ कोटी (रुपये दोनशे पंचवीस कोटी फक्त) इतक्या रक्कमेच्या खर्चाच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र.३ येथे नमुद करारनाम्यानुसार सदरहू कंपनीला देय असणारी रक्कम एकरकमी देय न करता, पुढील ६ वर्षाच्या कालावधीमध्ये (म्हणजेच प्रकल्प कार्यान्वित झाल्यावर २०% आणि उर्वरित ८०% रक्कम २० समान तिमाही हप्त्यामध्ये) अदा करणे बंधनकारक आहे.

पुणे व पिंपरी चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पाचे काम पुर्ण झाले असुन सदर प्रकल्प दि.२७.१०.२०१५ रोजी कार्यान्वित (Go-Live) झाला आहे. प्रकल्प सल्लागार, मे.पीडब्ल्युसी कंपनी यांनी संदर्भ क्र. ९ येथे नमुद दि.१६.११.२०१८ रोजीच्या ई-मेल संदेशाद्वारे दिलेल्या

अहवालानुसार प्रकल्पाच्या झालेल्या कामाची एकूण किंमत रु.२१७,६०,५९,०५२/- (अक्षरी रुपये दोनशे सतरा कोटी साठ लाख एकोणसाठ हजार बावन्न फक्त ) एवढी असल्याचे मे.पीडब्ल्युसी कंपनीने प्रमाणित केले आहे. मे. अलाईड डिजिटल सर्व्हिसेस लि. या कंपनीला पुणे सीसीटीव्ही प्रकल्पाच्या केलेल्या कामासाठी आजपर्यंत एकूण रु.१३०,८३,८२,८२०/- (अक्षरी रुपये एकशे तीस कोटी त्र्याऐंशी लाख ब्याऐंशी हजार आठशे वीस फक्त) एवढी रक्कम अदा करण्यात आली आहे. प्रकल्प सल्लागार,मे.पीडब्ल्युसी कंपनीने पुणे शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या विनंती प्रस्तावातील (Request For Proposal) तरतुदी व सेवा कराराच्या अटी व शर्ती प्रमाणे दि.१६.११.२०१८ रोजी सादर केलेल्या अहवालानुसार पुणे शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या कामासाठी बाराव्या तिमाही हप्त्याचे (Twelth Quarter) देयक म्हणून अदा करावयाच्या रु.८,५४,२६,०९२/- (अक्षरी रुपये आठ कोटी चोपन्न लाख सव्वीस हजार ब्यान्नव) एवढया रक्कमेपैकी मे. अलाईड डिजीटल सर्विसेस लि. या कंपनीला रु.७,०४,२६,०९२/- (अक्षरी रुपये सात कोटी चार लाख सव्वीस हजार ब्यान्नव फक्त ) एवढी रक्कम व सदर प्रकल्पासाठी मे.बीएसएनएल कंपनीने पुरविलेल्या नेटवर्क कनेक्टीव्हिटीसाठी अदा करावयाची रुपये १,५०,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी पन्नास लाख फक्त ) एवढी रक्कम अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

पुणे व पिंपरी चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पाबाबत मे.अलाईड डिजिटल सर्व्हिसेस लि. आणि महाराष्ट्र शासन यांचे दरम्यान दि. २८.१०.२०१३ रोजी करार झाला आहे. सदर करारनाम्याच्या अनुषंगाने प्रकल्प सल्लागार, मे. पीडब्ल्युसी कंपनीने सादर केलेल्या अहवालानुसार पुणे व पिंपरी चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या केलेल्या कामासाठी बाराव्या तिमाही हप्त्याचे (Twelth Quarter) देयक म्हणून अदा करावयाच्या रु.८,५४,२६,०९२/- (अक्षरी रुपये आठ कोटी चोपन्न लाख सव्वीस हजार ब्यान्नव) एवढया रक्कमेपैकी मे. अलाईड डिजीटल सर्विसेस लि. या कंपनीला रु.७,०४,२६,०९२/- (अक्षरी रुपये सात कोटी चार लाख सव्वीस हजार ब्यान्नव फक्त) एवढी रक्कम व सदर प्रकल्पासाठी मे.बीएसएनएल कंपनीने पुरविलेल्या नेटवर्क कनेक्टीव्हिटीसाठी अदा करावयाची रुपये १,५०,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी पन्नास लाख फक्त ) एवढी रक्कम अदा करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदरहू रक्कम आहरीत करण्यासाठी पोलीस आयुक्त, पुणे शहर यांना नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यास येत आहे. त्यांनी रु.७,०४,२६,०९२/- (अक्षरी रुपये सात कोटी चार लाख सव्वीस हजार ब्यान्नव फक्त ) एवढया रकमेचा धनादेश अलाईड डिजीटल सर्विसेस लि. कंपनीच्या कोटक महिंद्रा बँक, नरीमन पॉईन्ट शाखा, मुंबई यांचेकडील **ESCROW Account No.02312436713, IFSC: KKBK0000958** या

खात्यावर जमा करावा. तसेच रुपये १,५०,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी पन्नास लाख फक्त) एवढया रकमेचा धनादेश मे. बीएसएनएल कंपनीच्या आयसीआयसीआय बँक, शिवाजीनगर, पुणे या बँकेच्या **खाते क्र.003905003534, IFSC:ICIC0000039** या खात्यावर जमा करावा.

३. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च हा "मागणी क्र. बी-१०, ४०५५- पोलीस यावरील भांडवली खर्च, ८०० इतर खर्च, (००)(०९) सीसीटीव्ही संनियंत्रण यंत्रणा बसविणे (४०५५ ०२२३) योजनेतर योजना -५२ यंत्रसामग्री व साधनसामग्री" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२.४.२०१८ ला अनुसरुन प्रशासकीय विभागाला असलेलया अधिकारान्वये तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र. क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५ मधील वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-दोन, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व अनु.क्र. २७ अ, नियम क्र.७६ अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर देयक पुणे सीसीटीव्ही प्रकल्पाच्या करारनाम्यात नमूद केल्यानुसार यासाठी लागू असलेल्या सर्व प्रचलीत कर व इतर वजाती वसूल करुन अदा करण्यात यावे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२०५०९३८३३८५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kailas A. Gaikwad

Digitally signed by Kailas A. Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, cn=Kailas A. Gaikwad
Date: 2018.12.05 14:39:59 +05'30'

**( कैलास गायकवाड)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव
४. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव

५. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
६. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. पोलीस आयुक्त, पुणे शहर, पुणे
९. पोलीस आयुक्त, पिंपरी चिंचवड, पुणे
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
११. आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे
१२.आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पुणे
१३.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१४.मे.अलाईड डिजिटल सर्व्हिसेस लि., प्रिमाईसेस नं. १३-ए, १३ वा मजला, अर्नेस्ट हाऊस, बॅकबे रेक्लेमेशन, एनसीपीए रोड, ब्लॉक III, नरीमन पाईंट, मुंबई-२१.
१५.वित्त विभाग, व्यय-७/ वित्तीय सुधारणा.
१६.अवर सचिव, अर्थ-१,गृह विभाग.
१७.निवडनस्ती, पोल-३.

*****